डोंबिवली पोलीस स्टेशन येथील गु.र.नं.११४/२०१७ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यामध्ये मा.सत्र न्यायालय,मुंबई येथील न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड.श्री.अजय मिसर यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०६१७/प्र.क्र.१४४/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय, हुतात्मा राजुगुरु चौक
मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ ऑगस्ट,२०१८

**संदर्भ:- शासन अधिसुचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१७/यु.ओ.आर.६८/ डी-१४, दिनांक ११.०४.२०१८.**

**शासन निर्णय:-**

ठाणे जिल्ह्यातील डोंबिवली पोलीस स्टेशन येथील गु.र.नं.११४/२०१७ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या खटल्यामध्ये मा.सत्र न्यायालय,मुंबई येथील न्यायालयीन कामकाज पाहण्याकरीता ॲड.श्री.अजय मिसर यांची विधि व न्याय विभागाच्या संदर्भाधीन दि.११.०४.२०१८ च्या अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब,प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.अजय मिसर यांना प्रतिदिन खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी रु.१५,०००/-

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड.श्री.अजय मिसर यांना उपरोक्त फी व्यतिरिक्त अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी वा भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र.बी-१, "२०५५ पोलीस - (००)(१०९), जिल्हा पोलीस, (००) (०१), जिल्हा पोलीस दल- (२०५५ ०१६८) - २८ व्यावसायिक सेवा", या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०६/१८/व्यय-७, दिनांक २९.०६.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०१८०८१३१५०२४२५९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce6f6edd7e1dfc6b4d6b65b7d93aa1a1dbcf0ec79c7c2143850ff6e8fdcb4c0d, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2018.08.13 15:06:19 +05'30'

**( किशोर शामराव भालेराव )**
उप सचिव (विधि),गृह विभाग,
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई-०१.
२. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३. सह पोलीस आयुक्त (गुन्हे),ठाणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई .
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई.
७. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
९. ॲड.श्री.अजय मिसर, २१७/१,मारुती चेंबर,जिल्हा न्यायालय कम्पाऊंड, नाशिक-४२२ ००२.
९. निवडनस्ती (पोल-१०).